**केंद्र शासन पुरस्कृत अमृत अभियानांतर्गत हरित क्षेत्र विकास (Green Space Development) प्रकल्पाचे सविस्तर प्रकल्प अहवाल तयार करण्यासाठी मार्गदर्शक सूचना.....**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः अमृत-२०१६/प्र.क्र. १४६/नवि-३३**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
तारीख: २२ मार्च, २०१७

**प्रस्तावना -**

केंद्र शासन पुरस्कृत अमृत अभियानांतर्गत सन २०१५-१६ व सन २०१६-१७ च्या राज्य वार्षिक कृति आराखडयास केंद्र शासनाने मान्यता दिली असून सदर अभियानांतर्गत अभियान शहरांमध्ये हरित क्षेत्रांची निर्मिती करण्याच्या अनुषंगाने अभियान शहरांच्या हरित क्षेत्र विकास प्रकल्पांचा समावेश करण्यात आला आहे. त्याअनुषंगाने अभियान शहरांना मंजूर करण्यात आलेल्या हरित क्षेत्र विकास प्रकल्पाचा सविस्तर प्रकल्प अहवाल तयार करण्याच्या सूचना अभियान शहरांना देण्यात आल्या होत्या. हे अहवाल तयार करताना विचारात घ्यावयाच्या बाबी समक्रमांकाच्या दिनांक १८ एप्रिल, २०१६ च्या शासन परिपत्रकान्वये विहित केल्या होत्या. त्यामध्ये सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन परिपत्रक-**

केंद्र शासन पुरस्कृत अमृत अभियानांतर्गत मंजूर राज्य वार्षिक कृति आराखडयामध्ये समाविष्ट असलेल्या अभियान शहरांच्या हरित क्षेत्र विकास प्रकल्पाचे सविस्तर प्रकल्प अहवाल तयार **करताना पुढीलप्रमाणे सूचनांची अंमलबजावणी करणे आवश्यक राहील.**

१. अमृत अभियानांतर्गत अभियान शहरांमध्ये सदर अभियानाची अंमलबजावणी करण्यात येत असताना **अभियान शहरांमधील हरित आच्छादनाचे १५ टक्के इतके उद्दीष्ट साध्य करणे आवश्यक आहे**. त्याअनुषंगाने अमृत अभियानांतर्गत हरित क्षेत्र विकास प्रकल्प राबविण्यात येत असताना जास्तीत जास्त प्राधान्य हे हरित क्षेत्र वाढविणाऱ्या घटकांना देण्यात यावे.

२. महानगरपालिकांचा योजनाबध्द विकास आराखडा तयार करत असताना **हरित क्षेत्रांचा विकासासाठी राखून ठेवलेली ठिकाणे निश्चित** (Reserved for green cover / gardens) केलेली असतात. अशा क्षेत्रावर हरित क्षेत्रांचा विकास करण्याबाबतचे प्रकल्प प्रस्ताव प्रामुख्याने सादर करण्यात यावेत.

३. हरित क्षेत्र विकासाचे प्रकल्प राबविण्यात येत असताना हरित कामांचे उदा.झाडांची लागवड याचे प्रमाण हे जास्त राहील याची दक्षता घेण्यात यावी. असे करताना :-

अ) **प्रकल्प खर्चाच्या किमान ५० टक्के रक्कम फक्त हरितक्षेत्र विकसित करण्यावर म्हणजेच वृक्ष लागवडीवर खर्च होईल** या दृष्टीने नियोजन करणे आवश्यक राहील.

ब) यामध्ये सर्वसाधारण **२ ते ३ वर्षाची झाडे ज्यांचा सरासरी व्यास हा २.५ ते ३ इंच** असेल अशा झाडांचा समावेश करावा. तसेच **अशी अंदाजे सरासरी किमान ५००० झाडे या वृक्षवनात समाविष्ट होतील याची दक्षता घेण्यात यावी.**

४. हरित क्षेत्र विकासाचे प्रकल्प हाती घेताना सदर प्रस्तावामधील **सिव्हिल कामांवरील खर्च हा २० टक्केपेक्षा जास्त करण्यात येऊ नये. अपवादात्मक परिस्थितीत या प्रमाणात शिथिलता देण्याचा प्राधिकार राज्यस्तरीय तांत्रिक समितीस राहील.**

अ) अमृत अभियानांतर्गत नवीन बगीचा क्षेत्र विकसित करणार असल्यास त्यामध्ये कंपांउड वॉल, पिण्याच्या पाण्याची सुविधा, पर्जन्यजल संचय सुविधा , शौचालय, कंपोस्ट प्लँट, वॉटर वर्कस, वॉचमन शेड, कचरापेटी, आवश्यकता असल्यास विद्युत जोडणी यापैकी आवश्यक असणाऱ्या कामांचाच समावेश करण्यात यावा. तथापि **सदर कामावरील खर्च हा उपरोक्तप्रमाणे नमूद केलेप्रमाणे प्रकल्प किंमतीच्या २० टक्केच्या मर्यादेत करण्यात यावा**.

ब) जुन्या बगीचा क्षेत्राचे पुर्नज्जीवन करताना सिविल कामाच्या बाबींचा समावेश यापेक्षा कमी राहील याची कृपया दक्षता घ्यावी.

५. **उर्वरीत ३० टक्के खर्च हा लॉन, वेली, छोटी झाडे यावर करता येईल**.

६. बगीचा क्षेत्र विकसित करताना **बगीचातील पदपथ, कमान इत्यादी कामे ही शक्यतो नैसर्गिक स्वरुपाची राहतील** अशी दक्षता घ्यावी.

७. अशा हरित प्रकल्पामध्ये आवश्यक असणारी **इतर आयुधे जसे बेंचेस, खेळण्याची उपकरणे, व्यायामाची उपकरणे अशा विविध उपकरणांचा खर्च प्रकल्प किंमतीत समाविष्ट करण्यात येऊ नये.** सर्वसाधारणपणे अशा बाबींवरील खर्च **स्थानिक स्वराज्य संस्थांकडे इतर माध्यमातून उपलब्ध होणाऱ्या निधीतून तसेच सामाजिक दायित्व जबाबदाऱ्यांमधून (सी.एस.आर.) मिळविण्यात** यावा.

८. हरित क्षेत्र विकसित करताना अभियान **शहरांमधील हवामान, पाण्याची उपलब्धता व भौगोलिक परिस्थिती विचारात घेवून सदर परिस्थितीमध्ये जगू शकतील अशा सावली देणारे, शोभिवंत आणि फळफळावळ देणाऱ्या वृक्ष प्रजाती** प्राधान्याने लावण्यात याव्यात. स्थानिक परिस्थितीनुरूप अन्य रोपांची निवड व लागवड करण्यास मोकळीक असेल. जेणेकरुन पशु-पक्षी यांचा अधिवास (Habitation) व अन्न साखळी (Food Chain) टिकून राहील आणि जैवविविधतेचे (Bio-Diversity) संरक्षण व संवर्धन होण्यास मदत होईल.

९. सदर प्रकल्पांतर्गत झाडांचे जिवंत राहण्याचे प्रमाणे ८० ते ९० टक्के असेल याद्दष्टीने रोपांचे संरक्षण करणे, पाणीपुरवठा, कायमस्वरुपी देखभाल व संगोपन याबाबत आवश्यक नियोजन करावे.

१०.हरित क्षेत्र विकास प्रकल्पाच्या देखभाल व दुरुस्तीचा खर्च हा सविस्तर प्रकल्प अहवालामध्ये समाविष्ट करण्यात यावा. सदर प्रकल्पाचा देखभाल दुरुस्तीचा खर्चासाठी आवश्यक ती यंत्रणा अभियान शहरांनी विकसित करावी व त्याद्वारे सदर प्रकल्पासाठीचा देखभाल व दुरुस्तीचा खर्च भागविण्यात यावा.

११.सदर हरित क्षेत्र विकास प्रकल्प विकसित करत असताना शासनाच्या सार्वजनिक बांधकाम विभागाचा उद्यान कक्ष व सामाजिक वनीकरण विभागाचे आवश्यक ते मार्गदर्शन घेण्यात यावे.

१२.सदर सविस्तर प्रकल्प अहवालांना सक्षम तांत्रिक प्राधिकाऱ्याची तांत्रिक मान्यता घेण्यात यावी.

१३.**नगरपरिषदांच्या हरित प्रकल्पांच्या अहवालास नजीकच्या महानगरपालिकेच्या शहर अभियंता यांच्याकडून तांत्रिक मान्यता घेण्यात यावी**.

१४.अमृत अभियानांतर्गत तयार करण्यात येणाऱ्या हरित प्रकल्पांना **अमृत वन** असे नाव देण्यात यावे.

१५.अमृत अभियानांतर्गत अभियान शहरातील १५ टक्के हरित आवरणाचे उद्दीष्ट साध्य करण्याच्या अनुषंगाने व वैश्विक उष्णतेचे वाढणारे प्रमाण व हवामानातील बदल यांची तीव्रता व परिणामकारकता कमी करणे, पर्यावरणाचा समतोल, संतुलन, संवर्धन आणि सुरक्षा राखण्याचे उद्दीष्ट साध्य करण्याच्या अनुषंगाने हरित क्षेत्र विकास विषयक प्रकल्प राबविण्यात येत असताना उपरोक्त प्रमाणे बाबींचा परामर्श सविस्तर प्रकल्प अहवालामध्ये करण्यात यावा.

१६. त्याअनुषंगाने सर्व संबंधित अधिकारी यांनी सदर परिपत्रकामध्ये दिलेल्या सूचनांच्या अनुषंगाने आवश्यक कार्यवाही शासनाने विहित केलेल्या कालावधीमध्ये पूर्ण करून सविस्तर प्रकल्प अहवाल (डी.पी.आर) शासनास सादर करावा.

२. हा शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१७०३२२१७४१२८३१२५ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pandurang Jotiba Jadhav

Digitally signed by Pandurang Jotiba Jadhav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=300d785e12fdc19db0612f1ffdf83e54efe7da2b1bc63d18df8e09b3c7eece65, cn=Pandurang Jotiba Jadhav
Date: 2017.03.22 18:29:58 +05'30'

**( पां.जो.जाधव )**

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र नागरी विकास अभियान, सीआर-२, मुन्फ्रा इमारत, नरिमन पॉईंट,मुंबई.
२. आयुक्त सर्व महानगरपालिका (बृहंमुंबई महानगरपालिका वगळता)
३. मुख्याधिकारी,सातारा, इचलकरंजी, जालना, अंबरनाथ, भुसावळ, पनवेल, बदलापूर, बीड, गोंदिया, बार्शी, यवतमाळ, अचलपूर, उस्मानाबाद, नंदूरबार, वर्धा, उदगीर, हिंगणघाट नगरपरिषद
४. मुख्याधिकारी, शिर्डी नगरपंचायत, शिर्डी.